**भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम १९८८**
**अंतर्गत अभियोग दाखल करण्यास**
**मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशसन विभाग,**
**शा.नि.क्रमांक : अभियो -१३११/प्र.क्र. ८८/११अ**
**मंत्रालय, मुंबई -४०००३२**
**दिनांक - ३० ऑगस्ट, २०११**

**वाचा : १) शा.नि. सा.प्र.वि.सीडीआर १०९९/प्र.क्र.६२/९९/११-अ दि. ३/४/२०००**
**२) शा.नि. सा.प्र.वि. अभियो १३०९/प्र.क्र. १७/०९/११-अ दि.६/७/२००९**

**शासन निर्णय :-**

मुंबई उच्च न्यायालयात दाखल झालेल्या रिट याचिका क्र.६६५/२०११ मध्ये संदर्भांकित शासन निर्णय दिनांक ३.४.२००० मधील परिच्छेद ४ (अ) मधील तरतूद तसेच, या तरतूदीत सुधारणा करण्यासंदर्भातील त्यानंतरच्या शासन निर्णय दिनांक ६.७.२००९ मधील तरतूदीस आव्हानित करण्यात आले आहे. या तरतूदीसंदर्भातील विविध अग्राह्यता तपासून पाहिल्यानंतर संदर्भांकित दिनांक ३.४.२००० च्या शासन निर्णयातील परिच्छेद ४ (अ) मधील तरतूदी अधिक्रमित करुन सदर परिच्छेद ४ (अ) मधील तरतूद खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे :-

"अ) न्यायालयीन अभियोग दाखल करण्याच्या प्रकरणी प्रशासकीय विभागांनी सक्षम प्राधिकारी म्हणून निर्णय घेताना शासनाची मंजूरी घेणे अभिप्रेत आहे. गृह विभागाकडून प्रशासकीय विभागात प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर संबंधित विभागांनी स्वतंत्रपणे विस्तृत छाननी करुन अभियोग दाखल करण्यास मंजूरी द्यावयाची किंवा नाही याबाबत विधी परामर्शी यांचा सल्ला घेऊन निर्णय घ्यावा. त्यानंतर संबंधित विभागाने ज्यांचे वेतन रु.१०,६५०/- पेक्षा कमी आहे त्यांच्या बाबतीत प्रभारी मंत्री यांची मान्यता घ्यावी. जे अधिकारी रु. १०,६५०/- व त्यापेक्षा वरिष्ठ वेतनश्रेणीत वेतन घेतात त्यांच्याबाबत त्या विभागाचे प्रभारी मंत्री यांचेमार्फत मा.मुख्यमंत्री यांची मान्यता घ्यावी."

२. उपरोक्त शासन निर्णयाच्या परिणामी संदर्भांकित दि.६.७.२००९ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. **(संगणक सांकेतांक क्र.२०११०९०२२१०५८२१००१).**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( पां. जो. जाधव )
उप सचिव
सामान्य प्रशासन विभाग

प्रति,

मुख्य सचिव
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्री यांचे सचिव
उपमुख्यमंत्री यांचे सचिव
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक
महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधान सभा सचिवालय, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधान परिषद सचिवालय, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व प्रशासकीय कार्यासने
निवडनस्ती

*****